**<u>महा-रेशीम अभियान -२०१९</u>**
**तुती / टसर क्षेत्र नोंदणी कार्यक्रम दि.१५ डिसेंबर, २०१८ ते दि. २९ डिसेंबर, २०१८ या कालावधीत राबविणेबाबत.....**

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रावियो १०१८/ प्र.क्र.११८/ रेशीम कक्ष

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -३२
**दिनांक :** - १२ डिसेंबर, २०१८

**<u>वाचा :-</u>**

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक:-केपूयो २०१७/प्र.क्र.७/ रे. कक्ष, दि. ६ मार्च, २०१७
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक:-धोरण २०१७/प्र.क्र.६/ टेक्स-५, दि.१५ फेब्रूवारी, २०१८,
३) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्रमांक. रे/कार्या-८/महा-रे अभि २०१९/१८,१६८३ दि. २६.११.२०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्याचे वस्त्रोद्योग धोरण सदर्भाकीत शासन निर्णय, दिनांक १५ फेब्रूवारी, २०१८ अन्वये जाहीर करण्यात आले आहे. रेशीम उद्योग हा कृषि व वन संपत्तीवर आधारीत उद्योग असून यामध्ये रोजगाराची प्रचंड क्षमता आहे. महाराष्ट्रातील हवामान या उद्योगास पोषक आहे. त्यामुळे रेशीम उत्पादन करण्यास राज्यात भरपूर वाव आहे. या उद्योगाच्या माध्यमातून कृषि विकास दर वृध्दीबरोबर ग्रामीण भागातील जनतेचा आर्थिक स्तर व जीवनमान उंचावण्यास मदत करणारा हा उद्योग आहे. केंद्र व राज्य शासनाच्या विविध योजनेंच्या माध्यमातून रेशीम उद्योग राबविण्यात येतो. पंरतु शेतक-यांना व लाभार्थ्यांना या उद्योगाची परिपूर्ण माहिती नसल्यामुळे राज्यातील शेतकरी मोठया प्रमाणात या उद्योगाकडे वळलेले दिसून येत नाहीत. ही बाब लक्षात घेऊन रेशीम उद्योगाचा विकास करण्यासाठी सन २०१८-२३ या धोरण कालावधीत अनेक उपाययोजना हाती घेण्याचे उद्दीष्ट ठेवण्यात आले आहे. त्यास अनुसरुन व्यापक प्रमाणात प्रचार व प्रसार व्हावा म्हणून “महारेशीम अभियान” दरवर्षी राबविण्यात येत आहे. “महारेशीम अभियान - २०१८” ला राज्यात उत्फुर्त प्रतिसाद मिळाला असून तुती लागवडीकरीता तसेच टसर रेशीम करीता मोठ्या प्रमाणात नाव नोंदणी केली आहे. महारेशीम अभियान वर्ष २०१९ मध्ये तुती लागवड करू इच्छीणा-या शेतक-यांकरीता सदर अभियानाचा प्रचार व प्रसार करण्यासाठी बार्टी या संस्थेच्या समतादुतांची सेवा घेण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्या अनुषंगाने संचालक (रेशीम) यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार शासनाकडून मिळणा-या सहाय्याची माहिती याकरीता जनजागृती व या योजनेद्वारे मिळणा-या हमखास उत्पन्नाची जनतेला माहिती व्हावी, याकरीता दि. १५ डिसेंबर, २०१८ ते २९ डिसेंबर, २०१८ या कालावधीत सन २०१९ मध्ये तुती लागवड करणा-या शेतक-यांकरीता नाव नोंदणी **"महा-रेशीम अभियान-२०१९"** राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

**राज्यातील रेशीम शेतीचे महत्व व त्यातून मिळणा-या हमखास व शाश्वत उत्पन्नाची शेतक-यांना माहिती व्हावी याकरीता प्रचार व प्रसिध्दी करण्यासाठी तसेच या अनुषंगाने "महा-रेशीम अभियान-२०१९" अंतर्गत रेशीम उद्योगाकरीता नोंदणी १५ डिसेंबर, २०१८ ते २९ डिसेंबर, २०१८ या कालावधीत राज्यात महारेशीम अभियान राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

**१. महा रेशीम अभियानाचा उद्देश :-**केंद्र व राज्य शासनाच्या रेशीम विषयक विविध योजना शेतक-यांपर्यंत पोहोचविणे.

१. रेशीम योजनेच्या माध्यमातून शेतक-यांना शाश्वत उत्पन्नाचे साधन निर्माण करून उत्पन्नात वाढ करणे.
२. रेशीम योजनेची फलश्रुती व यशस्वीता याबाबत व्यापक प्रसिध्दी देणे
३. रेशीम उद्योगाचा समुह आधारीत सर्वांगीन विकास करणे. (Cluster based Soil to Silk Development).
४. तुती व टसर रेशीम उद्योगात महिलांचा सहभाग वाढविणे.
५. सामाजिक वनीकरण विभागामार्फत शेतक-यांच्या बांधावर तुती वृक्षाची लागवड करून पर्यावरणाचा समतोल राखण्यास मदत करुन शेतक-यांना पर्यायी उत्पन्नाचे साधन निर्माण करणे.
६. वन विभागाच्या सहाय्याने वनक्षेत्रात ऐन व अर्जुन वृक्षाच्या लागवडीमध्ये वाढ करणे.
७. रेशीम उत्पादक समुहांना वार्षिक लागवड क्षेत्राचे लक्षांक निश्चित करून येत्या वर्षात लक्षांक पुर्तता करणे.
८. नाविन्यपुर्ण रेशीम तंत्रज्ञान शेतक-यापर्यंत पोहचवणे.

**२. समित्या :-**

राज्यात महा-रेशीम अभियान यशस्वीपणे राबविण्यासाठी पुढीलप्रमाणे समित्या गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे. या समितीचे सदस्य वेगवेगळया स्तरावर त्यांच्या विभागातील अधिकारी /कर्मच-यांना रेशीम अभियानासाठीचा सहभाग याबाबत वेळोवेळी आढावा घेऊन त्यांच्या नियंत्रणाखालील शासकीय यंत्रणेला मार्गदर्शन करतील. तसेच या समितीचे सदस्य सचिव प्रस्तुत अभियान प्रभाविपणे राबविण्यासाठी येणा-या अडचणींचा किंवा अत्यावश्यक मार्गदर्शन घेण्याच्या बाबी समिती अध्यक्ष यांच्या निदर्शनास आणतील. राज्यस्तरीय व विभागीयस्तरावरील समिती अध्यक्ष या अभियानाअंतर्गत कामकाजाचा आढावा घेण्यासाठी अभियान कालावधीत दर तीन महिन्याला एकदा बैठक घेतील. जिल्हा व तालुकास्तरावरील समितीचे अध्यक्ष दर महीन्याला त्यांच्या नियंत्रणाखालील अधिका-यांच्या कामाचा आढावा घेऊन या संबधिचा अहवाल विभागीय व राज्यस्तरीय समिती सदस्य सचिव यांना सादर करतील.

| | | |
|---|---|---|
| **१) राज्य स्तरीय समिती :-** | १. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) | अध्यक्ष |
| | २ . प्रधान सचिव (वने) | सदस्य |
| | ३. प्रधान सचिव (कृषि) | सदस्य |
| | ४. सचिव (रोहयो) | सदस्य |
| | ५. प्रधान मुख्य वनसंरक्षक | सदस्य |
| | ६. आयुक्त (मनरेगा) | सदस्य |
| | ७. संचालक (रेशीम) | सदस्य |
| | ८. मुख्य प्रकल्प संचालक (समतादूत) बार्टी | सदस्य |
| | ९. उपसचिव (वस्त्रोद्योग) | सदस्य सचिव |
| **२) विभागस्तरीय समिती :-** | **१. विभागीय आयुक्त** | अध्यक्ष |
| | २.मुख्य वनसंरक्षक | सदस्य |
| | ३. सह संचालक (कृषि) | सदस्य |
| | ४. उप आयुक्त (रोहयो) | सदस्य |
| | ५. विभागीय प्रकल्प संचालक (समतादूत) बार्टी | सदस्य |
| | ६. सहायक संचालक (रेशीम) | सदस्य सचिव |
| **३) जिल्हास्तरीय समिती** -: | १. जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| | २. उप वनसंरक्षक | सदस्य |
| | ३. उप जिल्हाधिकारी -रोहयो | सदस्य |
| | ४. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (मनरेगा जि.प.) | सदस्य |
| | ५. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| | ६. प्रकल्प अधिकारी (समतादूत) बार्टी | सदस्य |
| | ७. जिल्हा रेशीम विकास अधिकारी | सदस्य सचिव |
| **४) तालुकास्तरीय समिती** -: | १. तहसिलदार | **अध्यक्ष** |
| | २. तालुका कृषि अधिकारी | सदस्य |
| | ३. गट विकास अधिकारी | सदस्य |
| | ४. रेशीम वरिष्ठ तांत्रिक सहायक/वरिष्ठ क्षेत्र सहायक/ क्षेत्र सहायक | सदस्य सचिव |

**३. तांत्रिक गट व नियोजन** :-

रेशीम अभियान राबविण्याकरीता संचालक (रेशीम) यांनी त्यांच्यास्तरावर तांत्रिक गटाची स्थापना करावी. या तांत्रिक गटाने रेशीम अभियान कार्यक्रमाच्या पूर्व तयारीसाठी सुक्ष्म नियोजन करावे. नियोजन करताना गाव हा घटक मानावा. सन २०१९ करीता तुती लागवडीचे ५,००० एकर क्षेत्रावर तुती लागवडीचे उदिष्ट ठरविण्यात आले आहे. त्या अनुषंगाने समुहनिहाय व कर्मचारीनिहाय तुती/टसर क्षेत्राचा लक्षांक तसेच क्षेत्रीय कामाची जबाबदारी निश्चित करून त्याप्रमाणे कार्यवाही व नियोजन संचालक (रेशीम) यांच्यास्तरावर करण्यात यावे.

**४. सदरचा आराखडा तयार करण्याकरीता सर्वसाधारण सुचना पुढीलप्रमाणे राहतील.**

१) तांत्रिक गटाने रेशीम अभियानाकरीता लागणारे सर्व साहित्य व सामुग्री उदा.बॅनर, बोर्ड, पॉम्पलेटस, माहितीपत्रके, चित्रफित तसेच प्रदर्शनासाठी आवश्यक साहीत्य इ.समावेश करताना त्याद्वारे देण्यात येणारा संदेश/माहितीमध्ये सुसंगत व एकरुपता राहील असे नियोजन करावे. याबाबत संचालक (रेशीम) यांनी नियंत्रण ठेवावे.

२) प्रत्येक जिल्हयाचा एक रेशीम रथ तयार करुन रेशीम अभियान राबविण्यात यावे. या रेशीम रथाकरीता लागणारी माहिती, तांत्रिक गटाने शिफारस केल्याप्रमाणे एक सारखी राहील याची सर्व संबधितांनी दक्षता घ्यावी.

३) जिल्हयातील रेशीम रथ तांत्रिक गटाने शिफारस केल्याप्रमाणे तयार करण्याची जबाबदारी संबधित जिल्हयातील रेशीम विकास अधिकारी यांची राहील.

४) आराखडा तयार करताना दि. २६ जानेवारी, २०१९ व दि. १५ ऑगस्ट, २०१९ च्या ग्रामसभेत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत रेशीम योजनेचा कृती आराखडा मंजूर असलेल्या गावात रेशीम अभियान राबविणे आवश्यक राहील.

५) तांत्रिक गटाने रेशीम अभियान सुरू करण्यापूर्वी जिल्हयामधील विविध समुहातील गावांमध्ये बैठक/ सभा/ मेळावा यांच्या तारीखनिहाय वेळापत्रक निश्चित करून अभियानाचे सुक्ष्म नियोजन करावे.

६) महा रेशीम अभियानाच्या नियोजनाकरीता ऑनलाईन संगणक प्रणाली विकसीत केली असून या प्रणालीवर माहिती भरून कार्यक्रमाचा समुह निहाय आराखडा तयार करण्याची संपूर्ण जबाबदारी संबधित जिल्हा रेशीम विकास अधिकारी यांची राहील.

७) या समुहनिहाय व गावनिहाय कार्यक्रमाचा आराखडा तालुकास्तरीय व जिल्हास्तरीय समितीकडे अभियान संबधीत समितीला पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.

८) या कार्यक्रम आराखडयाप्रमाणे रेशीम अभियान नियंत्रण व राबविण्याची जबाबदारी जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय समितीची राहील.

९) सर्व संबधीत समित्यांनी वेळोवेळी बैठका आयोजित करुन रेशीम अभियान कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्याची कार्यवाही करावी.

**५. महा रेशीम अभियानांचा शुभारंभ :-**

मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून राज्यातील इतर सर्व जिल्हयात जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व जिल्हयातील लोकप्रतिनिधी यांचेशी रेशीम विकास अधिकारी यांनी सपंर्क साधून उदघाटन कार्यक्रमाचे आयोजन करावे. या कार्यक्रमास प्रगतीशील शेतकरी, रेशीम उद्योजक, शेतीनिष्ठ व पुरस्कारप्राप्त शेतकरी, यांना आमंत्रित करण्यात येवून मार्गदर्शन करण्यात यावे. जिल्हयास्तरीवरील रेशीम अभियानाचे उदघाटन जिल्हाधिकारी यांचे हस्ते करण्यात यावे.

**६. तालुकास्तरीय समितीची कार्यवाही :-**

१) गावपातळीवरील बैठक आयोजनापूर्वी सर्व संबधिताना पूर्वसुचना देण्याची जबाबदारी संबधीत कार्यक्षेत्रातील रेशीम तांत्रिक अधिकारी/कर्मचारी यांची राहील.

२) गावपातळीवरील कार्यक्रमास जिल्हा परिषद सदस्य, पंचायात समिती सदस्य, समुहातील सरपंच, ग्रामस्थ, प्रगतीशिल शेतकरी, शेतीनिष्ठ व शेतीशी सबंधीत पुरस्कारप्राप्त शेतकरी, तसेच रेशीम उत्पादक शेतकरी, रेशीम मित्र आदींना आमंत्रित करण्याची जबाबदारी संबधित जिल्हयाचे अधिकारी व तांत्रिक कर्मचारी यांची राहील.

३) गावपातळीवरील कार्यक्रमामध्ये रेशीम प्रर्दशन आयेजित करणे, चित्रफित, पॉम्पलेटस व हस्तपत्रिका वाटप करणे इ. बाबतची जबाबदारी संबधित जिल्हयाचे रेशीम विकास अधिकारी व रेशीम विभागातील तांत्रिक कर्मचारी यांची राहील.

४) केंद्र व राज्य शासनाच्या विविध योजनेबाबत मार्गदर्शन तसेच रेशीम शेतीबाबत मार्गदर्शन व रेशीम कोषाचे खुल्या बाजारपेठेतील दैंनदिन दराबाबत अभियानांमध्ये शेतक-यांना माहिती द्यावी.

५) इतर पिकाच्या तुलनेत रेशीम उद्योगाचे अर्थशास्त्र समजावून सांगून रेशीम उद्योगाकडे शेतक-यांना आकर्षित करून पात्र लाभार्थ्यांचे नांव नोंदणी करणे.

६) ऑनलाईन नोंदणीबाबत मार्गदर्शन करणे, नोंदणी करण्याकरीता आवश्यक कागदपत्राची माहिती देणे.

७) समुह पध्दतीने रेशीम विकासाबाबत मार्गदर्शन करणे.

८) यशस्वी रेशीम उद्योजकाचे मार्गदर्शनपर व्याख्यानाचे आयोजन करणे.

९) शेतक-यांना तांत्रिक मार्गदर्शनाच्यावेळी दृकश्राव्य (Audio Visual) माध्यमातून रेशीम शेतीतील यशोगाथा यांचा प्रसार करावा.

१०) प्रत्येक गावामध्ये बैठकीसाठी किमान एक रेशीम तज्ञ, प्रगतीशील रेशीम शेतकरी, कृषि विभागाचे अधिकारी यापैकी किमान एक व्यक्ती उपस्थित राहील अशाप्रकारे नियोजन करणे.

**७. अभियानातील इतर बाबी :-**

१) रेशीम अभियानामध्ये नोंदणी केलेल्या रेशीम लाभार्थ्यांना तुती लागवडीकरीता आवश्यक रोपांचा पुरवठा करण्याचे नियोजन व कार्यवाही संबधित जिल्हयातील रेशीम विकास अधिकारी यांनी करावी. याबाबत रेशीम संचालक यांनी नियंत्रण करावे.

२) तुती रोपाकरीता शासकीय रेशीम फार्म, कृषि विज्ञान केंद्र, कृषि विद्यापिठे, शासकीय रोपवाटीका, सामाजिक वनीकरण विभागाच्या रोपवाटीका इ. ठिकाणी तुती रोपे उपलब्धतेबाबत नियोजन करण्यात यावे. तसेच पात्र रेशीम लाभार्थ्यांना दर्जेदार रोपाची निर्मिती स्वत:च्या क्षेत्रावर तयार करण्याचीसुध्दा मुभा दयावी.

३) तुती लागवडीचा कालावधी जून ते सप्टेबर अखेर पर्यंत राहील. या कालावधीत निश्चित केलेल्या क्षेत्रावर तुती लागवड होईल याची सर्व संबधित क्षेत्रीय अधिकारी व कर्मचारी यांनी दक्षता घ्यावी.

४) लागवडीच्या कालावधीत तुती लागवडीकरीता रोपे उपलब्ध व्हावे म्हणून शेतकरीनिहाय सुक्ष्म नियोजन करण्याची जबाबदारी क्षेत्रीय अधिकारी व रेशीम संचालनालयाची राहील.

५) समुहातील लक्षांकानुसार व नोंदणी झालेल्या लाभार्थ्यांना तुती रोपाद्वारे शतप्रतिशत तुती लागवड व्हावी म्हणून रोपांचे नियोजन करण्याची जबाबदारी संबधित जिल्हा रेशीम विकास अधिकारी व रेशीम संचालनालयाची राहील.

६) तुती लागवड सुरू करण्यापूर्वी रेशीम अभियानामध्ये नोंदविण्यात आलेल्या पात्र लाभार्थ्यांच्या प्रस्तावास पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मान्यता प्रदान करणे आवश्यक राहील.

| क्र. | कालावधी | कार्यवाहीची बाब | कार्यान्वयन यंत्रणा |
|---|---|---|---|
| १ | २६ जानेवारी | ग्रामसभा ठराव | ग्रामपंचायत |
| २ | १० फेब्रुवारी | पात्र लाभार्थ्याची यादी तहसिलदार यांचेकडे पाठविणे | ग्रामसेवक |
| ३ | २५ फेब्रुवारी | तांत्रिक मान्यतेकरीता पात्र लाभार्थ्यांची यादी संबधित जिल्हा रेशीम अधिका-याकडे पाठविणे | तहसिलदार |
| ४ | ५ मार्च | पात्र लाभार्थ्यांच्या रेशीम प्रकल्पाचे अंदाजपत्रक तयार करून तांत्रिक मान्यता देवून प्रस्ताव प्रशासकिय मान्यतेस्तव तहसिलदार यांचेकडे पाठविणे | रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१/२ |
| ५ | १५ एप्रिल | प्रकल्पास प्रशासकिय मान्यता देवून कार्यारंभ आदेश देणे | तहसिलदार |

७) टसर क्षेत्रातील लाभार्थ्यांची संख्या विशेषत: महिला लाभार्थ्यांच्या (महिला बचत गट) संख्येत वाढ करण्यासाठी वन विभागाच्या मदतीने ऐन व अर्जुन वृक्षाचे वनपट्टे उपलब्ध करून देण्याबाबत संबधित जिल्हा समितीने कार्यवाही करावी .

८) वन क्षेत्रामध्ये इतर वृक्षाची लागवडीबरोबर ऐन व अर्जुन वृक्षाची लागवड वाढविण्यासाठी वन विभागाच्या सहाय्याने कार्यक्रमाचे नियोजन करावे.

९) ग्रामस्तरावरील वन व्यवस्थापन समितीच्यामार्फत टसर उद्योग वाढीकरीता प्रयत्न करण्यात यावे . तसेच ऐन व अर्जुनवृक्ष संवर्धनाकरीता जनजागृती निर्माण करावी .

## ८. संनियंत्रण व पर्यवेक्षण

१) संचालक (रेशीम) यांनी त्यांच्या अधिनस्त कार्यालयातील अधिका-यामार्फत सर्व जिल्हयातील कार्यक्रमाचे संनियंत्रण करावे. जिल्हानिहाय कार्यक्रमाची जबाबदारी संबधित समितीची राहील. याबाबत त्यांना अवगत करावे. रेशीम अभियानाचा गावनिहाय कार्यक्रमाचा आराखडा (**परिशिष्ट-१)** नुसार तयार करुन नियोजन करावे. याबाबत ऑनलाईन संगणक प्रणाली विकसीत केली असून या अभियानाच्या नियोजनापासून ते कार्यक्रम अंमलबजावणी

पर्यंतची माहिती या प्रणालीवर उपलब्ध करण्यात येणार आहे.त्या प्रणालीच्या माध्यमातून कार्यक्रमाची माहिती दैंनदिन नोंदविणे आवश्यक राहील. त्याप्रमाणे महारेशीम अभियानाचे संचालक (रेशीम) यांनी संनियंत्रण करावे.

२) जिल्हयातील समुहनिहाय व गाव निहाय आयोजित कार्यक्रमाचा दैंनदिन अहवाल (**परिशिष्ट -२ अ)** नुसार) क्षेत्रीय कर्मचाऱ्यांनी दुस-या दिवशी सकाळी जिल्हा कार्यालयास सादर करावा. जिल्हा रेशीम अधिका-याने सदर अहवाल सहायक संचालक यांचेकडे त्याच दिवशी सादर करावा. विभागातील सर्व जिल्हयाचे दैंनदिन अहवाल (**परिशिष्ट-२ब)** मध्ये संकलीत करून सहायक संचालक (रेशीम) यांनी रेशीम संचालनायास सादर करावेत. रेशीम संचालनालयस्तरावरून रेशीम अभियान कार्यक्रमाकरीता जिल्हास्तरीय व विभागस्तरीय समन्वयक यांची नियुक्ती करण्यात यावी. या समन्वयक अधिका-यांनी विभागातील व जिल्हयातील कार्यक्रमांना भेटी देवून (**परिशिष्ट-३)** मध्ये अहवाल सादर करावा. रेशीम अभियान कालावधीत नविन नोंदणी करणा-या शेतक-यांचा दैंनदिन अहवाल(**परिशिष्ट-४)** नुसार सहायक संचालक यांच्यामार्फत रेशीम संचालनालयास सादर करावा. रेशीम अभियानाचा दैनंदिन व कार्यपुर्तता अहवाल शासनास विहीत मुदतीत संचालक (रेशीम) यांनी सादर करावा.

९. सदर रेशीम अभियान कार्यक्रमाकरीता स्वंतत्र निधीची तरतूद करण्यात येणार नसल्याने विविध मंजूर योजनामधील प्रशिक्षण, मेळावे, प्रचार व प्रसिध्दी या बाबीबरीता उपलब्ध असलेल्या निधीतून विहीत मर्यादेच्या व वित्तीय अधिकार नियमाच्या अधीन राहून खर्चाचे नियंत्रण करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.

**१०.** प्रस्तुत महा-रेशीम अभियान राबविण्यासाठी डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) , पुणे यांचे अधिपत्या खालील समतादुत यांच्या सेवा घेण्यात येतील. हे समतादूत प्रस्तुत महा-रेशीम अभियानाचे महत्व शेतक-यांना समजावुन सांगतील तसेच शेतक-यांना तुती लागवडी करीता नोंदणी सह सर्व प्रकारची मदत करतील. या अभियानासाठी नियुक्त करण्यात येणा-या समतादूतांना करांसहित सेवा शुल्क बार्टी, पुणे या संस्थेला अदा करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) करतील.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१२१६५३३३१७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ashish Anaclet Lopes

Digitally signed by Ashish Anaclet Lopes
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=97c1663938db95bf4b157b5906fb45b17fdf64e8db800c9618de046d6e51497c, serialNumber=4c69f8b7f13f76b97aa93b0d155291c61823c6e1d678a555f6eb04d1a38750cf, cn=Ashish Anaclet Lopes
Date: 2018.12.12 16:59:31 +05'30'

**( आ.अ.लोपिस )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

२. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,
३. मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,
४. सर्व सन्माननीय संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य,
५. सर्व सन्माननीय विधानसभा/ विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (कृषि), कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव ( महसूल ) महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (वने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव (ग्रामविकास) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. सचिव (रोहयो) जलसंधारण व रोजगार हमी योजना, मंत्रालय, मुंबई,
१२.सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.राज्य, नागपूर,
१५. आयुक्त, महात्मा गांधी ग्रामिण रोजगार हमी योजना, नागपूर
१६. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य,
१७.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य,
१८. संचालक (रेशीम) रेशीम संचालनालय, नागपूर,
१९.महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
२०.प्रकल्प संचालक, समतादूत कक्ष, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
२१.सर्व सहायक संचालक (रेशीम) नागपूर/ अमरावती/ पूणे/ औरंगाबाद,
२२.सर्व जिल्हा रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१/२,
२३. विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई,
२४. रेशीम कक्ष निवड नस्ती,

*****************

## परिशिष्ट -१

## रेशीम अभियान कार्यक्रमाचा समुहनिहाय नियोजनाचा आराखडा

**समुहाचे नाव ----------- तालुका------ जिल्हा -------------**

| क्र. | दिनांक | गावाचे नाव | कार्यक्रमाचे ठिकाण | वेळ | प्रस्तावित मार्गदर्शक अधिकारी/ प्रगतीशील शेतकरी/ रेशीम मित्र | संपर्क अधिकारी | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | नाव | भ्रमनध्वनी क्रमांक |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |
| | | | | | | | |

## परिशिष्ट २-अ

## रेशीम अभियान कार्यक्रम

## गावात आयोजित केलेल्या कार्यक्रमाचा तपशिल

१) समुहाचे नाव :- -------- २) गावाचे नांव ---------३) तालुका -------- ४) जि.--------

५) क्षेत्र सहायक/ जे.क्षे.सहा/ जे.तां.सहा यांचे नाव व भ्रमनध्वनी क्रमांक--------------

६) रेशीम मित्र / प्रगतीशिल रेशीम शेतकरी नांव व भ्रमनध्वनी क्रमांक ----------------

७) कार्यक्रमाचे ठिकाण ----------------------- वेळ -------------------------

८) उपस्थित शेतकरी संख्या---------------------------------

९) उपस्थित लोकप्रतिनिधी / पदाधिकारी यांचे नाव -------------------------------

उपस्थित मार्गदर्शक (शास्त्रज्ञ /अधिकारी/ प्रगतीशील शेतकरी/बचत गट/ संस्था प्रतिनिधी) -
------------------------------------------------------------------

| क्र | नाव | पदनाम | विभाग/संस्था | विषय |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

१०) कार्यक्रमाचा तपशिल -------------------------------------

स्वाक्षरी -/ स्वाक्षरी /-

**प्रगतिशिल रेशीम शेतकरी/ रेशीम मित्र** **क्षेत्र सहायक/ जे.क्षे.सहा/ जे.तां.सहा**

## परिशिष्ट २-ब

## रेशीम अभियान कार्यक्रमाचा समुहनिहाय दैंनदिन गोषवारा

**समुह -------------- तालुका -------------- जि---------- दि.------------**

| क्र. | समुहातील एकूण गावाची संख्या | कार्यक्रम घेतलेले गावे संख्या | उपस्थित शेतकरी संख्या | उपस्थित मार्गदर्शक संख्या | | | उपस्थित लोकप्रतिनिधी / पदाधिकारी संख्या | आयोजित कार्यक्रमाचा संक्षिप्त तपशिल |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | शास्त्रज्ञ | अधिकारी | प्रगतिशील शेतकरी | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |

## परिशिष्ट -३

## रेशीम अभियान समुहनिहाय दैंनदिन अहवाल

समन्वय अधिका-याचे नाव व पदनाम -----------------------

| क्र. | दिनांक | भेट दिलेले गाव / ठिकाण | तालुका व जिल्हा | उपस्थित शेतकरी संख्या | उपस्थित मार्गदर्शक शास्त्रज्ञ/ अधिकारी/ प्रगतीशिल शेतकरी | उपस्थित लोकप्रतिनिधी/ पदाधिकारी | आयोजित कार्यक्रमाचा संक्षिप्त तपशिल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |

**समन्वयक अधिका-याची स्वाक्षरी/-**

## परिशिष्ट -४

## रेशीम अभियान नोंदणीचा कार्यपुर्तता अहवाल

समुह ------------- तालुका ------------ जिल्हा.-----------

| अ.क्र. | दिनांक | कार्यक्रम घेतलेल्या गावाचे नाव | नविन नोंदणीचा तपशिल | |
|---|---|---|---|---|
| | | | शेतक-यांचे नाव | भ्रमनध्वनी क्रमांक |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |
| | | | | |

**समन्वयक अधिका-याची स्वाक्षरी/-**